<u>राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम</u>
निधी वितरण- सन २०१४-१५ (SCSP)

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः तंनिका-२०१५/निधी वितरण/प्र.क्र.१९/आरोग्य-५

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख : १८ मार्च , २०१५

<u>वाचा -</u>

१) **संचालक (वित्त), आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र No. G.२५०१२/५/२००९/NRHM Finance, दि.१० फेब्रुवारी, २०१४.**
२) **केंद्र शासनाच्या आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालयाचे आदेश F.No.P.१६०१२/२२/२०१४-PH-I(FTS-१०३५८८/२०१४)(I), दि.२८ ऑक्टोबर, २०१४.**
३) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. प्रशामा/प्र.क्र.३०६/आरोग्य-५, दि.१६ जानेवारी, २०१५.**
४) **सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/NCD/नस्ती क्र.२६/हिस्सा ७७-८२/१५, दि.१६ जानेवारी, २०१५.**

<u>प्रस्तावना -</u>

राष्ट्रीय तंबाखु नियंत्रण कार्यक्रम हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम असून, या कार्यक्रमासाठी अनुदानाचे प्रमाण, केंद्र शासन ७५% हिस्सा व राज्य शासन २५% हिस्सा असे आहे. या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाकडून उपलब्ध होणारा निधी (१) सर्वसाधारण निधी (General) (२) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (Schedule Cast Sub Plan) (३) जनजाती (आदिवासी) उपयोजना (Tribal Area Sub Plan), अशा तीन वेगवेगळया उप योजनांकरिता दिला जातो. सदर अनुदान राज्याच्या एकत्रित निधीद्वारे निधी उपलब्ध करुन देण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत तीनही उपयोजनांसाठी केंद्र हिस्सा व राज्य हिश्श्याची रक्कम वितरणासाठी स्वतंत्र लेखाशिर्षे उघडण्यात आली आहेत.

राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजनेसाठी (Schedule Cast Sub Plan) घेण्यात आलेल्या २२१०F६७६ (केंद्र हिस्सा) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी रु.४९.६० लक्ष इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. तसेच २२१०F६८५ (राज्य हिस्सा) या लेखाशिर्षाखाली चालू वित्तीय वर्षात रु.१६.५३ लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी केंद्र शासनाने पहिल्या टप्प्यात आदेश क्र.**F.No.P.16012/22/2014-PH-I(FTS-103588/2014)(I),** दि.२८ ऑक्टोबर, २०१४ अन्वये अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजनेसाठी **(Schedule Cast Sub Plan)** वितरीत केलेला रु.३.३३ लक्ष व त्यावरील राज्य हिश्शाचा देय असलेला रु.८३,२५०/- असा एकूण रु.४,१६,२५०/- इतका निधी कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

***शासन निर्णय :-***

राष्ट्रीय तंबाखु नियंत्रण कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाचे आदेश क्र.F.No.P.16012/22/2014-PH-I(FTS-103588/2014) (I), दि.२८ ऑक्टोबर, २०१४ अन्वये अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजनेसाठी (Schedule Cast Sub Plan) राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला केंद्र हिश्शाचा रु.३.३३ लक्ष इतका निधी व त्यावर राज्य हिश्श्याचा देय असलेला रु.८३,२५०/- असा एकूण **रु.४,१६,२५०/- (अक्षरी रुपये चार लक्ष सोळा हजार दोनशे पन्नास फक्त)** इतका निधी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा निधी राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील लाभार्थ्यांसाठीच खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर- १
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
७८९ - अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना
(०१) अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत योजना,
केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा)
(०१) (२२) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम (रातंनिका)
(२२१० एफ ६७६) (केंद्र हिस्सा)

(०२) (२३) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम (रातंनिका)
(२२१० एफ ६८५) (राज्य हिस्सा)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमांतर्गत वितरीत केलेल्या निधीचा ताळमेळ राखण्यासाठी सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर निधीशी संबंधीत देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी रक्कम संबंधीत कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करावी.

सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभाग, व्यय-१५ व अर्थोपाय शाखेच्या सहमतीने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.२०६/२०१५/व्यय-१५, दि.२७/०३/२०१५ व क्र.३९३/२०१४-१५/अर्थोपाय, दि.०५/०३/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१८१५०९०७१०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2015.03.19 11:30:53 +05'30'

**(ज्ञा. ल. सुळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई.
५) प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (विघयो), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (व्यय-१३)/(व्यय-१५)/(अर्थसंकल्प)/(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१२) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा)/(लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती (आरोग्य-५).